महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, अंतर्गत कार्यरत अधिकाऱ्यांचा आशियाई विकास बँक (ADB) यांच्या आर्थिक सहाय्याने दि.१३ ऑगस्ट २०२३ ते २७ ऑगस्ट २०२३ या कालावधीत ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड येथे होणा-या अभ्यास दौ-यास मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः** मुग्रायो-२०२३/प्र.क्र.२३८/बांधकाम-४

५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

तारीख: ११ ऑगस्ट २०२३

**वाचा :**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.परदौ-१४१४/प्र.क्र.४६/११,दिनांक ०१ फेब्रुवारी, २०२१

२. शासन निर्णय ग्रामविकास विभाग, मुंबई क्रमांक मुग्रायो २०२१/प्र.क्र.१६५/बांध-४, दिनांक ०६.०१.२०२२

३. DEA,Fund Bank &ADB Division॰s Letter No.३/१३/२०१९-ADB-II, Dt.२६th May २०२३

४. मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था,पुणे. यांच्याकडील पत्र क्र.PMGSY/७९४/२०२२ दि.११.०५.२०२२. रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

मुख्यमंत्री ग्रामसडक योजना आशियाई विकास बँक अर्थसहाय्यित (ADB) प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र ग्रामीण रस्ते क्षेत्राच्या शाश्वत विकासासाठी संस्थात्मक बळकटीकरण करण्यासाठी महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (MRRDA) अंतर्गत कार्यरत अधिकाऱ्यांना आशियाई विकास बँक यांच्या मार्फत अभ्यास दौरा आयोजित करण्यात आले आहे . सदर अभ्यास दौरा दि.१३ ऑगस्ट २०२३ ते २७ ऑगस्ट २०२३ या कालावधीत ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड येथे आयोजित करण्यात आला आहे. सदर अभ्यास दौ-यासाठी महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (MRRDA) अंतर्गत कार्यरत १९ अधिकारी यांच्या गटास उक्त नमुद अभ्यास दौऱ्याकरिता मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था,आशियाई विकास बँकेच्या (ADB) आर्थिक सहाय्याने मुख्यमंत्री ग्रामसडक योजना अंतर्गत महाराष्ट्र राज्यातील ग्रामीण रस्ते सुधारणा कार्यक्रम राबवित

आहेत. ADB च्या कर्ज अटींच्या अनुषंगाने तांत्रिक सहाय्य सल्लागार (Technical Assistance) म्हणून सट्रा सर्व्हिसेस अँड सोल्युशन्स प्रा. लि. सिकंदराबाद यांना आशियाई विकास बँकेमार्फत नियुक्त करण्यात आलेले आहे.

०२. सट्रा सर्व्हिसेस अँड सोल्युशन्स प्रा. लि. सिकंदराबाद, तांत्रिक सहाय्य सल्लागार यांचे महाराष्ट्र ग्रामीण रस्ते क्षेत्राच्या शाश्वत विकासासाठी संस्थात्मक बळकटीकरण करण्यासाठी या संस्थेअंतर्गत कार्यरत अधिकाऱ्यांचा अभ्यास दौरा आयोजित करण्यात आला आहे. या प्रशिक्षणाचे प्रमुख उद्दिष्ट महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था कर्मचा-यांची क्षमता वाढविणे आणि महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था अधिकाऱ्यांना आंतरराष्ट्रीय अभ्यास दौ-यामध्ये आंतरराष्ट्रीय दर्जाच्या कार्यपद्धतींचा परिचय व्हावा, ज्यायोगे संस्थेअंतर्गत कार्यरत अधिकाऱ्यांना त्यांच्या कामामध्ये वैविध्यपूर्ण कौशल्ये विकसित होतील, अशा व्यापक दृष्टीकोनातून आंतराष्ट्रीय प्रशिक्षण व अभ्यास दौरा आयोजित करण्याची पूर्व अट आहे.

०३. त्याअनुषंगाने सट्रा सर्व्हिसेस अँड सोल्युशन्स प्रा. लि. सिकंदराबाद तर्फे ०८ कामाच्या दिवसांचा (०८ working days ) अभ्यास दौरा ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड या ठिकाणी प्रस्तावित केलेला आहे. यास्तव सोबत जोडलेल्या परिशिष्ट - अ मध्ये नमुद MRRDA च्या १९ अधिकाऱ्यांना दि.१३ ऑगस्ट २०२३ ते २७ ऑगस्ट २०२३ या कालावधीत ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड येथे आयोजित केलेल्या अभ्यास दौऱ्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०४. सदर अभ्यास दौ-याचे आयोजन सट्रा सर्व्हिसेस अँड सोल्युशन्स प्रा. लि. सिकदराबाद तर्फे आशियाई विकास बँकेच्या (ADB) आर्थिक सहाय्याने करण्यात आले असून त्यासंदर्भात या अभ्यास दौ-यांकरीता राज्य शासन अथवा केंद्र शासनाच्या कोणत्याही योजनेतून निधीची मागणी करण्यात आलेली नाही वा करण्यात येणार नाही. प्रस्तुत अभ्यास दौरा हा आशियाई विकास बँकेच्या कर्ज वितरणांतील अटींनुसार, प्रकल्पाकरिता नियुक्त तांत्रिक सहाय्यक सल्लागार यांनी आयोजित करणे बंधनकारक आहे.

०५. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या आणि शिफारस समितीच्या तसेच केंद्र शासनाच्या Ministry of External Affairs व Department of Economic Affairs,भारत सरकार यांच्या प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर अभ्यास दौरा पूर्ण झाल्यानंतर अभ्यास दौऱ्यासंबंधीचा विस्तृत अहवाल ग्राम विकास विभाग आणि सामान्य प्रशासन विभागास सादर करावा. तसेच अभ्यास दौऱ्यात प्राप्त झालेल्या ज्ञानाचा / कौशल्याचा उपयोग अन्य अधिकारी / कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्यासाठी करावा.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०८१११००७४२१३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.08.11 13:47:42 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. मा.प्र.स. (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. मा.सचिव, (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, कॅम्प ऑफीस, पुणे.
८. खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.), मंत्रालय, मुंबई-३२.
९. वित्तीय नियंत्रक तथा उप सचिव (बांध-४) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.उप सचिव (नियंत्रक अधिकारी/रोखशाखा) ग्रा.वि.विभाग, बांधकाम भवन, मुंबई.

११.उप सचिव ( अर्थसंकल्प) ग्रा.वि.विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई- ०१

१२.निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई

१३. कक्ष अधिकारी, रोखशाखा, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४.सर्व संबधित अधीक्षक अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, .

१५.सर्व संबधित कार्यकारी अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था

१६.वित्तीय सल्लागार, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना.

१७.माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य.

१८. निवड नस्ती (कार्यासन बांधकाम-४) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

## परिशिष्ट-अ

**(शासन निर्णय क्र. मुग्रायो २०२३/प्र.क्र.२३८/बांध-४,दि.११.०८.२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्ट)**

| दौ याचे ठिकाण- | पासून | पर्यंत | अधिकारी यांचे नाव व पद |
|---|---|---|---|
| ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड | दि.१३ ऑगस्ट २०२३ | दि.२७ ऑगस्ट २०२३ | १)श्री. एकनाथ डवले,प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग,मंत्रालय, मुंबई,<br>२)श्री. के. टी. पाटील, सचिव, मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, मुंबई,<br>३) श्री. अभय धांडे, वित्तिय नियंत्रक, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई,<br>४) श्री. एस. एस. माने, मुख्य अभियंता, प्रमंग्रासयो, पुणे,<br>५)श्री. पी.व्ही.पाटील, उप सचिव, ग्रामविकास विभाग,मंत्रालय, मुंबई,<br>६) श्रीमती ज्योति कुलकर्णी, राज्य गुणवत्ता समन्वयक, प्रमंग्रासयो, पुणे,<br>७) श्री. व्ही. एम. भदाणे, अधीक्षक अभियंता, प्रमंग्रासयो, नाशिक विभाग, नाशिक,<br>८) श्रीमती विभावरी वैद्य,अधीक्षक अभियंता, प्रमंग्रासयो,अमरावती विभाग,अमरावती,<br>९) श्री. विवेक रमेश शिंदे, कक्ष अधिकारी, ग्रामविकास विभाग, मुंबई,<br>१०) श्री. अच्युतराव इप्पर,कक्ष अधिकारी, ग्रामविकास विभाग,मुंबई,<br>११) श्री. दिनेश परदेशी, कार्यकारी अभियंता, प्रमंग्रासयो, सोलापूर,<br>१२) श्री. एस. सी. राठोड, कार्यकारी अभियंता, प्रमंग्रासयो, जळगाव,<br>१३) श्री.व्ही. जी. बोडके, सहाय्यक लेखा अधिकारी, ग्रामविकास विभाग, मुंबई,<br>१४)श्री. विवेक माळुंदे, कार्यकारी अभियंता, प्रमंग्रासयो, नाशिक,<br>१५) श्री. प्रफुल्ल केळकर, कार्यकारी अभियंता, प्रमंग्रासयो, भंडारा,<br>१६) श्री. ए. डी. सगर, कार्यकारी अभियंता, प्रमंग्रासयो, बीड,<br>१७) श्री. नितीन देशमुख, कार्यकारी अभियंता, प्रमंग्रासयो, अमरावती,<br>१८) श्री. पी. जी. लोखंडे, कार्यकारी अभियंता, प्रमंग्रासयो, चंद्रपुर,<br>१९)श्री. नितीन नाठक, कार्यकारी अभियंता, प्रमंग्रासयो, अकोला, |